सामाजिक न्याय विभागाच्या योजनांचा प्रचार व प्रसिध्दी महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसवर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रसिध्दी २०१४/प्र.क्र.१६(२)/विघयो,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ मे,२०१५.

__वाचा__ :- आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र.सकआ/अजाउयो/प्रसिध्दी/ सन २०१४-१५/का-१४/१०१, दि.०७.०२.२०१५

**प्रस्तावना :**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या योजना हया मुख्यत: मागासवर्गीय लोकांसाठी राबविण्यात येतात. या योजनांच्या माहिती अभावी अनेक पात्र लाभार्थी या योजनांच्या लाभापासून वंचित राहतात. सामाजिक न्याय विभागाच्या विविध योजनांची माहिती शहरी व ग्रामीण भागातील जनतेपर्यंत पोहचविण्याच्या उद्देशाने या योजनांना प्रसिध्दी देण्यासाठी विविध प्रसार माध्यमांचा वापर करण्यात येतो. ग्रामीण भागातील बहुतांशी लोकांचा प्रवास महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या (एस.टी.) बसेसमधून होत असतो. या बसेस ग्रामीण भागात खेडोपाडी पोहोचतात. सदर बसेसवरील जाहिरात जनतेचे लक्ष वेधून घेते. म्हणून सामाजिक न्याय विभागाच्या विविध कल्याणकारी योजनांची प्रसिध्दी महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या (एस.टी.) बसेसवरील जाहिरातीव्दारे करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

सामाजिक न्याय विभागाच्या अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणा-या योजनांचा प्रचार व प्रसिध्दी राज्य परिवहन महामंडळाच्या (एस.टी.) बसेसवर करण्यासाठी मे. पृथ्वी असोसिएटस,मुंबई या संस्थेस एकूण रु.३,९९,८७,२८२/- (अक्षरी रुपये तीन कोटी नव्यान्नव लक्ष सत्त्याऐंशी हजार दोनशे ब्याऐंशी फक्त) इतक्या मर्यादेत काम देण्यास पुढील अटी व शर्तीस अधिन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | संस्थेचे नाव | प्रसिध्दी माध्यम | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १ | मे.पृथ्वी असोसिएटस, मुंबई | २००६ एमएसआरटीसी साईड पॅनल (२ महिन्याकरीता) (१२.३६ सर्विस टॅक्स सह) | २,०३,०९,५८६ |
| | | २००६ एमएसआरटीसी बॅक पॅनल (२ महिन्याकरीता) (१२.३६ सर्विस टॅक्स सह) | १,९६,७७,६९६ |
| | एकूण रक्कम | | ३,९९,८७,२८२ |

१) महाराष्ट्र राज्य रस्ते परीवहन महामंडळ(MSRTC) यांनी मे. पृथ्वी असोसिएटस, मुंबई यांची दि.२.१२.२०१४ व दि. २१.४.२०१५ च्या पत्रान्वये प्रसिध्दी करीता नेमणूक केलेली आहे,याबाबत खातरजमा करण्यात यावी.

२) सदरहू जाहिरात संस्थेला जाहिरातीचे पूर्ण हक्क प्राप्त आहेत काय याची खात्री करावी.

३) अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत राबविण्यात येणा-या आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक विकासाच्या योजनांच्या जाहिरातींची निवड आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी आपल्या स्तरावर करावी व त्याबाबतची तपशिलवार माहिती मे.पृथ्वी असोसिएटस, मुंबई यांना द्यावी.

४) सदर जाहिरात प्रत्यक्षात प्रसिध्द होते किंवा कसे याची खात्री करुन तसे प्रमाणित करावे.

५) सदर जाहिरात कोणत्या तारखेपासून कोणत्या तारखेपर्यंत प्रसिध्दी झाली याची नोंद प्रमाणित करुन घेण्यात यावी.

६) ज्या जाहिरातींच्या प्रसिध्दीसाठी रक्कम अदा करावयाची आहे ते पूर्ण झाले असल्याबाबत महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळाच्या सर्व संबंधित आगारांकडून खात्री करुन घेण्याची सर्वस्वी जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांची राहिल.

७) उपरोक्त नमूद सर्व अटींची पुर्तता होऊन जाहिरातीचा २ महिन्याचा कलावधी पूर्ण झाल्यानंतर सदरच्या जाहिरातीच्या प्रसिध्दीचे देयक संबंधीत कंपनीस अदा करण्यात यावे.

८) आयुक्त,समाजकल्याण,पुणे यांनी आवश्यक अटी व शर्तीसहीत (नियमीत अटी व शर्तीसह) मे.पृथ्वी असोसिटस,मुंबई यांच्यासोबत करारनामा करुन घ्यावा.

२. उपरोक्त नमुद महाराष्ट्र परिवहन महामंडळाच्या साध्या बसेसच्या मागील बाजूच्या पॅनेलवर व साईड बाजूच्या पॅनेलवर सोबतच्या विवरणपत्रानुसार २ महिन्याचा कालावधी निश्चित करण्यात येत आहे.

३. याकरिता आयुक्त,समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यावर होणारा खर्च मागणी क्र.एन-३,२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण,०१,१०२ आर्थिक विकास (०३)(०५), अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या योजनांना समाजकल्याण संचालनालयामार्फत व्यापक प्रसिध्दी देणे(विघयो) (२२२५ ३७२५), जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर दर्शविण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०५०७१३२६१९८८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: CN = Dinesh Ramchandra Dingle, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.18 15:43:19 +05'30'

**(दि.रा.डिंगळे)**

उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य
६) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
७) आयुक्त,समाजकल्याण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (६० दिवसांच्या कालावधीच्या विवरणपत्रासहित)
८) महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र ½,मुंबई/नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे
१०) मे.पृथ्वी असोसिएटस,मुंबई
११) कक्ष अधिकारी,(अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) निवडनस्ती,विघयो.